लक्ष्मी नारायण अभिनव तंत्रज्ञान विद्यापीठ, नागपूर येथे मुलींचे वसतिगृह इमारत बांधकाम करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग

## शासन निर्णय क्र. वसति-२०२३/प्र.क्र.४१/विशि-२

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १३ मार्च, २०२४.

**वाचा :-** विभागाचा समक्रमांकाचा दि.२२.०५.२०२३ रोजीचा शासन निर्णय.

**प्रस्तावना :-**

लक्ष्मी नारायण इन्स्टीट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, नागपूर या संस्थेची स्थापना नागपूर येथे १९४२ मध्ये झाली असून, सदर संस्था मध्य भारतातील रसायन तंत्रज्ञान या क्षेत्रात नावाजलेली संस्था असून, रसायन तंत्रज्ञान क्षेत्रात पदवी ते संशोधन या टप्प्यापर्यंत कार्य करते. या संस्थेचे लक्ष्मी नारायण अभिनव तंत्रज्ञान विद्यापीठ (एलआयटी विद्यापीठ), नागपूर मध्ये रूपांतर करण्यात आले असुन, लक्ष्मी नारायण अभिनव तंत्रज्ञान विद्यापीठ (एलआयटी विद्यापीठ) अस्तित्वात आले आहे. या विद्यापीठात मुलींचे वसतिगृह इमारत बांधकाम करण्याकरीता रु.१०००.०० लक्ष किंमतीच्या वसतीगृह इमारतीच्या अंदाजपत्रकास वाचा येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. आता या कामासाठी निधी वितरीत करण्याची विद्यापीठाने विनंती केली आहे. त्यानुसार या कामासाठी वित्त विभागाने निधी वितरीत करण्यास सहमती दर्शविल्यानुसार मुलींचे वसतिगृह इमारत बांधकाम करण्याकरीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

लक्ष्मी नारायण अभिनव तंत्रज्ञान विद्यापीठ, नागपूर येथे मुलींचे वसतिगृह इमारत बांधकाम करण्यासाठी रु.२,००,००,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी फक्त) एवढा निधी खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

२. **अटी व शर्ती :-**

१. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी अनुदान मंजुर केले आहे, त्याच उद्दिष्टासाठी वापर करावा आणि त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक (उच्च शिक्षण), पुणे यांचेमार्फत तात्काळ शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.
२. बांधकामाची प्रगती शासनास वेळोवेळी अवगत करावी.
३. विषयांकित कामाकरिता सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, यादृष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.
४. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई किंवा प्रकरण परत्वे महालेखापाल-२ नागपूर त्यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

३. सदरहू मंजूर झालेला निधी लक्ष्मी नारायण अभिनव तंत्रज्ञान विद्यापीठ, नागपूर यांना तातडीने उपलब्ध करुन देण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

४. या कामासाठी होणारा "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशिर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३ - विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (००) (०७) सर्वसाधारण शिक्षणासाठी विद्यापीठांना अनुदाने (अनिवार्य) (२२०२ ०७४५), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखालील सन २०२३-२०२४ मधील मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२३, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.१२.०४.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३३४/२०२४/व्यय-५, दि.२६.०२.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३१३१५१३०२२१०८ असा आहे. महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHARAD SARJERAO KOKATE

Digitally signed by SHARAD SARJERAO KOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=be7c6620763057633615219444ed5ba258ae7d29f78cddb94fc3e83bfa2424200,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=95D25EC736C5F76DA241E96AD9552FF908EFC6582DF4A4ECADD1C4C6CD038195, cn=SHARAD SARJERAO KOKATE
Date: 2024.03.13 15:23:01 +05'30'

**( शरद कोकाटे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री, (गृह) महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) कुलगुरू, लक्ष्मी नारायण अभिनव तंत्रज्ञान विद्यापीठ, नागपूर.
६) कुलसचिव, लक्ष्मी नारायण अभिनव तंत्रज्ञान विद्यापीठ, नागपूर.
७) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती).
८) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
९) महालेखापाल, (लेखा परीक्षण) - १/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१०) सह संचालक, उच्च शिक्षण, नागपूर.
११) अधिदान व लेखा अधिकारी, नागपूर.
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
१४) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१५) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६) उप सचिव (अर्थसंकल्प), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१७) अवर सचिव (अर्थसंकल्प शाखा), उच्च व तंत्र शिक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई.
१८) निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.